मुंबई मेट्रो लाईन-१ (वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर) च्या धोरणात्मक अधिग्रहणाबाबत स्वतंत्र अभ्यास गटाने सादर केलेल्या अहवालासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या १५६व्या बैठकीत केलेल्या ठराव क्रमांक १६९३ या ठरावास तसेच सदर मार्गिकेचे प्राधिकरणाद्वारे धोरणात्मक अधिग्रहण करण्यास मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः- एमआरडी-३३२४/प्र.क्र.४६/नवि-७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांकः- १५ मार्च, २०२४.

प्रस्तावनाः-

राज्य शासनाने दि. १४ जून २००६ रोजी मुंबई मेट्रो लाईन-१ (वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर) या ११.५४ किमी लांबी व १२ स्थानकांचा समावेश असलेला प्रकल्प रिलायंस इन्फ्रास्ट्रक्चर लिमिटेड आणि व्हिओलिया ट्रान्सपोर्ट एस.ए यांच्या कंन्सोर्सशियम द्वारे सार्वजनिक खाजगी भागीदारीत (PPP) विकसित करण्यासाठी मान्यता प्रदान केली आहे.

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण आणि सवलतकार यांच्याद्वारे दि. २२ डिसेंबर २००६ रोजी मुंबई मेट्रो वन प्रायव्हेट लिमिटेड (MMOPL) या विशेष उद्दिष्ट वाहन (SPV) कंपनीची स्थापना करण्यात आली. दि. ७ मार्च २००७ रोजी, प्राधिकरण आणि MMOPL यांच्यामध्ये मुंबई मेट्रो लाईन-१, उन्नत मार्गाचे बांधकाम आणि अंमलबजावणीसाठी सवलत करार करण्यात आला. प्रकल्पाचे काम सन २०१४ मध्ये काम पूर्ण झाले आणि दि. ८ जून २०१४ पासून मार्गिका सार्वजनिक वाहतुकीसाठी खुली करण्यात आली आहे.

याप्रकरणी प्राधिकरणामार्फत मुंबई मेट्रो लाईन-१ च्या धोरणात्मक संपादनाबाबत शिफारस करण्यासाठी स्वतंत्र अभ्यास गटाची (ISG) ची स्थापना करण्यात आली होती. स्वतंत्र अभ्यास गटाने आपला अहवाल दि.५ डिसेंबर, २०२३ रोजी प्राधिकरणास सादर केला. आता, प्राधिकरणाने दि.०६.०३.२०२४ रोजीच्या पत्राद्वारे, मुंबई मेट्रो लाईन-१ च्या धोरणात्मक अधिग्रहणाबाबत अहवालासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या १५६व्या बैठकीत केलेल्या ठराव क्र. १६९३ या ठरावास मान्यता देण्याची तसेच मुंबई मेट्रो लाईन-१ च्या धोरणात्मक अधिग्रहणास शासन मान्यता देण्याची विनंती त्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मुंबई मेट्रो लाईन-१ (वर्सोवा - अंधेरी - घाटकोपर) च्या धोरणात्मक अधिग्रहणाबाबत स्वतंत्र अभ्यास गटाने सादर केलेल्या अहवालासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या १५६व्या बैठकीत केलेल्या ठराव क्रमांक १६९३ या ठरावास तसेच मुंबई मेट्रो लाईन-१ च्या धोरणात्मक

अधिग्रहणास शासन मान्यता देण्याच्या प्राधिकरणाच्या प्रस्तावास या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

१) मुंबई मेट्रो लाईन-१ (वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर) या मेट्रो मार्गिकेच्या धोरणात्मक अधिग्रहणाबाबत मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाद्वारे श्री. जॉनी जोसेफ, माजी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या स्वतंत्र अभ्यास गटाने सादर केलेल्या अहवालासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या १५६व्या बैठकीत केलेल्या ठराव क्र. १६९३ या ठरावास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२) प्राधिकरणाचा ठराव क्र.१६९३ विचारात घेऊन मुंबई मेट्रो लाईन-१ (वर्सोवा-अंधेरी-घाटकोपर) या मेट्रो मार्गिकेचे प्राधिकरणाद्वारे धोरणात्मक अधिग्रहण करण्यास, यामुळे राज्य शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही या अटीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर धोरणात्मक अधिग्रहणापोटी द्यावी लागणारी किंमत व अधिग्रहणासाठी येणारा संपूर्ण खर्च प्राधिकरणाने स्वनिधीतून करावयाचा आहे.

**०२.** सदरचा शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र.१६८/व्यय-३, दि.११.०३.२०२४ अन्वये दिलेले अभिप्राय व मा. मंत्रीमंडळाने दि.११.०३.२०२४ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५१५१४३२०५२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 15:23:47 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.

१०) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखाअनुज्ञता-१/२), महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर.

११) संचालक, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई.

१२) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.

१३) कार्यासन अधिकारी, व्यय-३/अर्थबळ/साधनसंपती, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) कार्यासन अधिकारी, नवि-४/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) निवडनस्ती (नवि-७)